राज्यातील कार्यरत कौटुंबिक न्यायालयांबाबत वाहन आढावा.

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- कौटुंन्या -१११५/प्र.क्र. १७८/का.नऊ**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक :- २० डिसेंबर, २०१६

**वाचा :-** वित्त विभाग शासन निर्णय क्र.वाहन-२०१०/प्र.क्र.५०/१०/विनियम, दि. १० जानेवारी, २०११.

**प्रस्तावना :-**

सन २०१० मध्ये राज्यातील कौटुंबिक न्यायालय मुंबई, पुणे, नागपूर, औरंगाबाद, अकोला, अमरावती आणि ठाणे बाबतचा वाहन आढाव्याचा प्रस्ताव राज्यस्तरीय वाहन आढावा समितीच्या मान्यतेसाठी सादर करण्यात आला होता. त्यास राज्यस्तरीय वाहन आढावा समितीने दि. २३.०९.२०१० रोजी मान्यता दिली तथापि याबाबतचे आदेश निर्गमित झाल्याचे दिसुन आले नाही. तद्नंतर कौटुंबिक न्यायालय नाशिक, सोलापूर, कोल्हापूर आणि नांदेड याबाबतचा वाहन आढाव्याचा प्रस्ताव राज्यस्तरीय वाहन आढावा समितीच्या मान्यतेसाठी सादर करण्यात आला होता. त्यास दि.०२.११.२०१६ रोजी मान्यता दिली आहे. अशा प्रकारे राज्यातील कार्यरत कौटुंबिक न्यायालयांबाबतचा वाहन आढावा घेण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

राज्यातील कार्यरत कौटुंबिक न्यायालयातील प्रमुख न्यायाधिश/न्यायाधिश या पदांची कर्तव्ये व जबाबदाऱ्यांचा विचार करुन राज्यस्तरीय वाहन आढावा समितीने मान्यता दिल्यानुसार पुढीलप्रमाणे वाहन आढावा मंजूर करण्यात येत आहे.

| अ. क्र. | कौटुंबिक न्यायालय | वाहन अनुज्ञेय असलेले न्यायिक अधिकारी | उपलब्ध वाहने | आढाव्यानुसार अनुज्ञेय वाहने |
|---|---|---|---|---|
| १ | मुंबई | १ प्रमुख न्यायाधिश<br>६ न्यायाधिश | ३ | ३ |
| २ | पुणे | १ प्रमुख न्यायाधिश<br>४ न्यायाधिश | २ | २ |
| ३ | नागपूर | १ प्रमुख न्यायाधिश<br>३ न्यायाधिश | - | २ |
| ४ | औरंगाबाद | १ प्रमुख न्यायाधिश<br>१ न्यायाधिश | १ | १ |
| ५ | अकोला | १ न्यायाधिश | १ | १ |
| ६ | अमरावती | १ न्यायाधिश | - | १ |
| ७ | ठाणे | १ न्यायाधिश | १ | १ |
| ८ | नाशिक | १ न्यायाधिश | १ | १ कार |
| ९ | सोलापूर | १ न्यायाधिश | - | १ कार |
| १० | कोल्हापूर | १ न्यायाधिश | - | १ कार |
| ११ | नांदेड | १ न्यायाधिश | - | १ कार |
| | | **एकूण** | **९** | **१५** |

२. नवीन वाहन खरेदी अथवा निर्लेखित वाहनाच्या ऐवजी नवीन वाहन खरेदीच्या प्रस्तावास शासनाची मान्यता घेणे आवश्यक राहील.

३. सदर शासन निर्णय हा वित्त विभागाचे अनौपचारिक संदर्भ क्र.३९५/२०१० दि.२३/०९/२०१० व क्र.४१३/विनियम, दि.१०/०८/२०१६ अन्वये प्राप्त झालेल्या त्या विभागाच्या सहमतीने तथा सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१६१२३११६३७२४८७१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Neeraj Pradip Dhote

Digitally signed by Neeraj Pradip Dhote
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=LA Cum Joint Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=714efbf760da6c143fdf63d5ec3da8a8957b82d41451a5f202043ce4895e4205, cn=Neeraj Pradip Dhote
Date: 2016.12.31 16:39:45 +05'30'

( नी.प्र. धोटे )
विधि सल्लागार-नि-सह सचिव,

**प्रति,**

१. प्रधान सचिव (वित्त), वित्त विभाग तथा अध्यक्ष, राज्यस्तरीय वाहन आढावा समिती,
२. महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई,
३. परिवहन आयुक्त तथा सदस्य सचिव, राज्यस्तरीय वाहन आढावा समिती,मुंबई,
४. महालेखापाल-१ (लेखापरीक्षा/लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई,
५. महालेखापाल-२ (लेखापरीक्षा/लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर,
६. प्रमुख न्यायाधिश/न्यायाधिश, कौटुंबिक न्यायालय मुंबई, पुणे, नागपूर, औरंगाबाद, अकोला, अमरावती, ठाणे, नांदेड, सोलापूर, कोल्हापूर आणि नाशिक,
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
८. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई,
९. वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे, नागपूर, औरंगाबाद, अकोला, अमरावती, ठाणे, नांदेड, सोलापूर, कोल्हापूर आणि नाशिक,
१०. वित्त विभाग व्यय-५, ६, विनियम.
११. निवड नस्ती.